राज्यातील “ब” वर्ग दर्जाच्या नगरपरिषदांमधील मुख्याधिकारी पदावर मुख्याधिकारी गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२१प्र.क्र.१५५/नवि-१४,**
मंत्रालय, मुख्य इमारत (४ था मजला),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक - २८ ऑक्टोबर, २०२१.

संदर्भ:- १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-१२०६/प्र.क्र.२३९/०६/नवि-१४,दि.१२.०४. २००७.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२०/प्र.क्र.०५/नवि-१४, दि.१९.१०.२०२०.

**प्रस्तावना:-**

सद्य:स्थितीत राज्यात ७३ “ब” वर्ग दर्जाच्या नगरपरिषदा आहेत. ब वर्ग नगरपरिषदांपैकी ७५००० हजार पेक्षा जास्त लोकसंख्या असणाऱ्या “ब” वर्ग नगरपरिषदांमध्ये गट-अ संवर्गातील मुख्याधिकारी नियुक्ती करण्याबाबतचा निर्णय संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. त्यानुसार, सद्यस्थितीत १० “ब” वर्ग नगरपरिषदांमधील मुख्याधिकारी पदे गट-अ संवर्गातील मुख्याधिकाऱ्यांसाठी निश्चित करण्यात आलेली आहेत.

“ब” वर्ग दर्जाची नगरपरिषद असणाऱ्या सर्वच शहरामधील वेगाने होणारे नागरीकरण, स्थिर व तरंगत्या लोकसंख्या वाढीचे प्रमाण व त्यामुळे अशा वेगाने वाढत असलेल्या शहरांच्या नियोजन बध्द विकासासाठी वरिष्ठ व अनुभवी अधिकारी नियुक्तीची आवश्यकता निदर्शित होत आहे. तसेच विकास प्रकल्पांसाठी अर्थसंकल्पीत होणाऱ्या निधीचा गुणात्मक विनियोग, केंद्र व राज्य शासनाच्या अमृत, स्वच्छ भारत अभियान, नगरोत्थान अभियान अशा अनेक महत्वाकांक्षी योजनांची प्रभावी व गतीमान अंमलबजावणी, आरोग्य विषयक बदलती आव्हाने, नैसर्गिक आपत्ती अशा जबाबदारीचे निर्वाहन नियोजनबध्द व प्रभावीपणे करण्यासाठी “ब” वर्ग नगरपरिषदांमध्ये प्रशासन प्रमुख म्हणून मुख्याधिकारी गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे अभिप्राय मागविण्यात आले होते. तद्नुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

राज्यातील “ब” वर्ग नगरपरिषदांमध्ये मुख्याधिकारी गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्याबाबत खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे:-

(अ) राज्यातील “ब” वर्ग नगरपरिषदांमध्ये मुख्याधिकारी संवर्गातील गट-अ दर्जाच्या अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(ब) सदर नियुक्त्या करण्याच्या दृष्टीने सद्यस्थितीत ६३ “ब” वर्ग नगरपरिषदांमधील नियुक्तीसाठी मुख्याधिकारी संवर्गातील गट-ब श्रेणीतील (वेतनश्रेणी एस-१५) ६३ पदे मुख्याधिकारी गट-अ संवर्गात (वेतनश्रेणी एस-२०) मध्ये समाविष्ट करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(क) उपरोक्तप्रमाणे “ब” वर्ग नगरपरिषदांमध्ये मुख्याधिकारी संवर्गातील गट-अ दर्जाच्या अधिकाऱ्यांची नियुक्ती केल्यानंतर महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ कलम ७५-अ(५) नुसार नगरपरिषदांमध्ये कार्यरत मुख्याधिकाऱ्यांचे वेतन व भत्ते नगरपरिषद निधीतूनच देण्यात यावे.

(ड) “ब” वर्ग नगरपरिषदांना शासन देत असलेल्या कोणत्याही अनुदानाचा व विशेषत्वाने सहायक अनुदानाचा वापर मुख्याधिकाऱ्यांच्या वेतनासाठी करता येणार नाही हे स्पष्टपणे नमुद करण्यात येत आहे.

(ई) मुख्याधिकारी वेतनासाठी कोणत्याही शासन अनुदानाचा वापर झाल्यास सदर बाब वित्तीय अनियमितता म्हणून समजण्यात येऊन त्याची जबाबदारी संबंधित लेखापाल, लेखापरिक्षक व आहरण व संवितरण अधिकारी यांची असेल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२८१२४७१४९६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sachin Dattatray Sahasrabuddhe

Digitally signed by Sachin Dattatray Sahasrabuddhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7db996f7c088dbf2d76ad85484362957aab596e46ec268eca3b9822aa62fd32b, serialNumber=67648ad8c40ecf8d0f911eaf72d918202f02f540836a5f65e8b71c0a69d61291, cn=Sachin Dattatray Sahasrabuddhe
Date: 2021.10.28 17:17:48 +05'30'

**(सचिन द. सहस्त्रबुध्दे)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत: -**

१. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
२. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
३. मा.विधानसभा/ मा.विधानपरिषद, सदस्य (सर्व)
४. मा.राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
५. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव महोदयांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.मंत्री(नगर विकास)महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.राज्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
११.विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक (सर्व)

१२.जिल्हाधिकारी (सर्व)
१३.महालेखाकार महाराष्ट्र (लेखा/ अनुज्ञेयता) १/२, मुंबई/ नागपूर.
१४.महालेखाकार महाराष्ट्र (लेखा/ परिक्षा) १/२, मुंबई/ नागपूर.
१५.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा.
१६.सह / उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७.सर्व मुख्याधिकारी (नगरपरिषदा व नगरपंचायती)
१८. निवडनस्ती (नवि-१४)